शासकीय कर्मचा-यांची नियत सेवावधीपूर्व
सेवानिवृत्ती ----
विशेष पुनर्विलोकन समित्यांची पुनर्रचना ....

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक क्रमांक एसआरसी-१०८६/३१[१]/पंधरा-२,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक ४ मार्च १९८६.

संदर्भ :- १] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक - एसआरव्ही-१०७०-डी, दिनांक १४-९-१९७०.
२] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक - एसआरसी-१०८५/९६०/३१/पंधरा, दिनांक ६-११-१९८५.

परिपत्रक :-

महाराष्ट्र नागरी सेवा [निवृत्ती वेतन] नियम, १९८२ च्या नियम-१०[४] व ६५ नुसार सार्वजनिक हितास्तव, अकार्यक्षम/संशयास्पद सचोटीच्या अधिका-यांना/कर्मचा-यांना शासनाच्या सेवेतून मुदतपूर्व सेवानिवृत्त करण्याचे अधिकार समुचित प्राधिका-यांना [नियुक्ती प्राधिका-यांना] आहेत. शासनाच्या सेवेतील वर्ग-१ व वर्ग-२ चे अधिकारी आणि मंत्रालयातील वर्ग-३ च्या कर्मचा-यांची वयाच्या ५०/५५ वर्षापुढे सेवेत राहण्याची पात्रापात्रता अजमाविण्याच्या दृष्टीने पुनर्विलोकन करुन नियुक्ती प्राधिका-यांना सल्ला देण्यासाठी शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही-१०७०-डी, दिनांक १४-९-१९७० नुसार त्यामध्ये वेळोवेळी केलेल्या सुधारणांच्या अधीन राहून विशेष/तदर्थ पुनर्विलोकन समित्यांची स्थापना करण्यात आली आहे.

२. प्रस्तुत विषयावरील संबंधित आदेशाचे अधिक्रमण करुन शासनाच्या सेवेतील वर्ग-१ व वर्ग-२ चे अधिकारी आणि मंत्रालयीन विभागातील वर्ग-३ च्या कर्मचा-यांची वयाच्या ५०/५५ वर्षापुढे त्याचप्रमाणे ३० वर्षाच्या अर्हकारी सेवेपुढे, ह्यापैकी जे अगोदर घडेल तेव्हा, सेवेत राहण्याची पात्रापात्रता अजमाविण्याच्या दृष्टीने पुनर्विलोकन करुन समुचित प्राधिका-यांना [नियुक्ती प्राधिका-यांना] सल्ला देण्यासाठी विशेष पुनर्विलोकन समित्यांची पुनर्रचना खालीलप्रमाणे करण्यात येत आहे :-

[१] विशेष पुनर्विलोकन समिती क्र. १ : शासनातील वर्ग-१ चे सर्व अधिका-यांबाबत

| | |
|---|---|
| १] श्री. वा. क. चौगुले,<br>अपर मुख्य सचिव, सामान्य<br>प्रशासन विभाग, उद्योग, ऊर्जा<br>व कामगार [उद्योग] विभाग. | अध्यक्ष |
| २] श्री. स. शं. तिनईकर,<br>सचिव, ग्राम विकास [रोजगार<br>योजना] विभाग, व पदसिद्ध सचिव,<br>नियोजन विभाग. | सदस्य |

[कृ. मा. प.]

३] श्री. बा. वि. चव्हाण, सदस्य
सचिव, विधी व न्याय विभाग,
[विधी परामर्शी] आणि
विधान कार्य विभाग.

४] श्री. ग. ज. देशमाने, सचिव
उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग.

[२] विशेष पुनर्विलोकन समिती क्रमांक २ :

१] सामान्य प्रशासन विभाग २] विधान कार्य विभाग, ३]गृह विभाग,
४] नगर विकास विभाग, ५] सार्वजनिक आरोग्य विभाग, ६]वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, ७] सार्वजनिक बांधकाम विभाग,
८] पाटबंधारे विभाग, ९] शिक्षण व सेवायोजन विभाग, १०] समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व पर्यटन विभाग, ११] आदिवासी कल्याण विभाग, १२] गृह निर्माण व विशेष सहाय्य विभाग,

ह्यांच्या नियंत्रणाखालील वर्ग-२ च्या अधिका-यांबाबत :-

१] श्री. वि. ति. चारी, अध्यक्ष
विशेष सचिव, महसूल व
वन [वन] विभाग

२] श्रीमती शांता शास्त्री, सदस्या
विशेष कार्य अधिकारी आणि
सह विकास आयुक्त, वर्धा योजना
आणि सचिव, शिक्षण व सेवायोजन
[तांत्रिक शिक्षण]

३] श्री. दे. ना. चौधरी, सदस्य
सचिव, विधी व न्याय विभाग,
[विधी विधान]

४] श्री. द. पां. दोंदे, सचिव
उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग.

[३] विशेष पुनर्विलोकन समिती क्रमांक ३ :-

१] महसूल व वन विभाग, २] उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग
३] कृषि व सहकार विभाग, ४] ग्रामविकास विभाग, ५] अन्न व नागरी पुरवठा विभाग, ६] विधी व न्याय विभाग,
७] वित्त विभाग, ८] नियोजन विभाग व ९] फलोत्पादन व सामाजिक वनिकरण विभाग.

ह्यांच्या नियंत्रणाखालील वर्ग-२ च्या अधिका-यांबाबत तसेच मंत्रालयातील सर्व वर्ग-३ च्या कर्मचा-यांबाबत ...

| | |
|---|---|
| १] डॉ. एम. डी. गोडबोले,<br>सचिव, सामान्य प्रशासन विभाग | अध्यक्ष |
| २] श्री. श. गो. पैठणकर,<br>सचिव, नियोजन [वित्तीय संस्था-<br>मार्फत अर्थपुरवठा] विभाग. | सदस्य |
| ३] श्री. ना. पा. रेगे,<br>सचिव, विधी व न्याय विभाग,<br>[वरिष्ठ विधी सल्लागार] | सदस्य |
| ४] श्री. मु. स. मोकाशी,<br>उपसचिव, सामान्य प्रशासन<br>विभाग. | सचिव |

३. मंत्रालयाबाहेरील बृहन्मुंबईतील व मुफस्सल कार्यालयातील तृतीय श्रेणीच्या कर्मचा-यांचे पुनर्विलोकन करण्यासाठी सध्या अस्तित्वात असलेल्या विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख अध्यक्ष असलेल्या विशेष पुनर्विलोकन समित्यांची पुनर्रचना शासन परिपत्रक, क्रमांक एसआरसी-१०८६/३१[२]/पंधरा-३, दिनांक ४ मार्च १९८६ अनुसार करण्यात येत आहे.

४. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही-१०६९-डी, दिनांक ३०-९-१९६९ नुसार तत्पश्चात केलेल्या सुधारणांच्या अधीन देण्यात आलेल्या पुनर्विलोकनाच्या कार्यपध्दती विषयक सूचनांनुसार विशेष पुनर्विलोकन समित्यांनी अधिका-यांची/कर्मचा-यांची वयाच्या ५०/५५ व्या वर्षापुढे तसेच ३० वर्षांच्या अर्हकारी सेवेनंतर सेवेत राहण्याची पात्रापात्रता अजमावून त्यानुसार समुचित प्राधिका-यांकडे आपली शिफारस पाठवावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही/-

[ पु. अ. उपारकर ]
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
शासनाचे सर्व सचिव,
मंत्रालयाचे सर्व विभाग,
सर्व विभाग प्रमुख,
निवड फाईल.